गोंदिया तालुका क्रीडा संकुलांसाठी तरतूद वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१७/प्र.क्र.१५/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.राक्रीधो २००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो २००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.
३) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.ताक्रीसं/पुमा/१०/२०१६-१७/ का-९/२१७, दिनांक ११ जानेवारी, २०१७.

प्रस्तावना :-

राज्याचे क्रीडा धोरण २००१ अंतर्गत तालुका स्तरावर तालुका क्रीडा संकुल उभारण्याची योजना दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. दिनांक २१ मार्च, २००९ च्या शासन निर्णयानुसार तालुका क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.२५.०० लाखावरुन रु.१.०० कोटी एवढी करण्यात आली आहे.

२. तालुका क्रीडा संकुल योजनेतंर्गत गोंदिया, जि.गोंदिया येथील तालुका क्रीडा संकुलासाठी हाती घ्यावयाच्या विविध क्रीडा विषयक कामांसाठी अतिरिक्त तरतूदींची आवश्यकता विचारात घेता डिसेंबर, २०१६ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.७५.०० लक्षची तरतूद पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. दिनांक २६.०३.२००३ च्या शासन निर्णयान्वये राज्य क्रीडा विकास समितीची स्थापना करण्यात करण्यात आली आहे. सदर समितीस विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलातील विविध क्रीडा सुविधांसाठी तांत्रिक, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार आहेत. सदर राज्य क्रीडा विकास समितीच्या दि.२९.०२.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत गोंदिया तालुका क्रीडा संकुलांच्या क्रीडा विषयक सुविधांच्या अंदाजपत्रक व आराखडयास प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार क्रीडा व युवक संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये गोंदिया तालुका क्रीडा संकुलासाठी मंजूर रु.७५.०० लक्ष तरतूद वितरीत करण्याची विनंती करण्यात आली आहे. त्याप्रमाणे

गोंदिया तालुका क्रीडा संकुलांसाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त पार्श्वभूमीवर डिसेंबर, २०१६ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये गोंदिया तालुका क्रीडा संकुलासाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.७५.०० लक्ष तरतूदीपैकी रु.६४.५९ लक्ष एवढी तरतूद वितरीत करुन सदर तरतूद आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता/ बाबींकरिता मंजूर केला आहे. त्याच बाबींकरिता खर्च करण्यात यावा.

२. सन २०१६-१७ मध्ये क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.६४.५९ लक्ष एवढया तरतुदी मधून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (२२०४ १७९२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक २०.०४.२०१६ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहंरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र१५/१४७१, दिनांक १९.०१.२०१७ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र२२०/व्यय-५, दिनांक१७.०२.२०१७ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१५३२२७३१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.17 15:33:44 +05'30'

**( कि. ल. संखे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा क्रीडा संकुल समिती, गोंदिया. (क्रीडा संचालनालयामार्फत)
५. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
६. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
७. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नागपूर विभाग, नागपूर. (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. जिल्हा क्रीडा अधिकारी, गोंदिया. ( क्रीडा संचालनालयामार्फत),
९. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-३२.
११. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (क्रीयुसे-१).